तात्काळ/अर्थसंकल्प प्राथम्य

सन २०१०-२०११ या वर्षाच्या अर्थसंकल्पीय अंदाजावर विधानमंडळामध्ये चर्चा

**महाराष्ट्र शासन,**
**वित्त विभाग,**
**परिपत्रक क्र.अंदाज-२०.१०/प्र.क्र. ०२ /२०१०/अर्थसंकल्प-३**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक : २६ मार्च, २०१०**

**परिपत्रक**

**"अ"**

मंत्रालयाच्या सर्व विभागांना असे कळविण्यात येत आहे की, २०१०-२०११ चा अर्थसंकल्प गुरूवार दिनांक २५ मार्च,२०१० रोजी विधानमंडळाला सादर करण्यात आला आहे. सर्व मंत्रालयीन विभागांना त्यांच्या अर्थसंकल्पीय प्रकाशनांच्या प्रती विभागाकडे परस्पर पाठविण्याविषयीच्या सूचना शासकीय मध्यवर्ती मुद्रणालयाला देण्यात आलेल्या आहेत. अर्थसंकल्पीय अंदाजावर विधानसभेमध्ये व विधानपरिषदेमध्ये दिनांक **२९ व ३० मार्च, २०१०** रोजी सर्वसाधारण चर्चा होणार आहे.

सर्वसाधारण चर्चेच्या वेळी विभागाच्या अर्थसंकल्पाचे प्रभारी उपसचिव/सहसचिव यांनी विधानसभेत व विधान परिषदेत उपस्थित राहवे. अर्थसंकल्पावरील सर्वसाधारण चर्चेमध्ये उपस्थित करण्यात आलेल्या, विभागाशी संबंधीत असलेल्या प्रश्नांवर तातडीने टिप्पण्या तयार करण्यात याव्यात व त्या थेट मा.वित्तमंत्री, मा.वित्त राज्यमंत्री यांना पाठविण्यात याव्यात, तसेच त्यांची एक प्रत वित्त विभागाला (अर्थसंकल्प-३) पाठविल्या जातील याचीही खातरजमा करुन घ्यावी अशा सूचना विभागांना देण्यात येत आहे. या टिप्पण्यांच्या प्रती विभागाशी संबंधित मा.मंत्र्यांना व मा. राज्य मंत्र्यांनाही सादर कराव्यात.

**"ब"**

तसेच २०१०-२०११ च्या अर्थसंकल्पीय मागण्यांवर विधानसभेमध्ये विभागवार चर्चा व मतदान दिनांक ३१ मार्च, २०१० पासून सुरु होणार आहे.

मंत्रालयाच्या सर्व विभागांना सूचित करण्यात येते की, चर्चेच्या वेळी त्यांच्या विभागाशी संबंधित जबाबदार अधिकारी विधानसभेत हजर राहतील अशी व्यवस्था करावी. चर्चेला उत्तर संबंधित विभागांचे मंत्री देत असल्यामुळे चर्चेच्यावेळी उपस्थित करण्यात येणा-या मुद्यांसबंधी टिप्पणी इत्यादी मंत्रिमहोदयांना देण्याची व्यवस्था सदर अधिका-यांनी करावी.

पूर्वनियोजित कार्यक्रमाप्रमाणे महाराष्ट्र विनियोजन विधेयक,२०१० हे विधानसभा व विधानपरिषदेत दिनांक २० एप्रिल,२०१० रोजी चर्चेला येणार आहे. ज्या मंत्रालयीन विभागांना विभागवार चर्चेमध्ये प्राथम्यक्रम दिला गेला नाही त्या विभागांच्या मागण्यांच्या संबंधात सभासदांकडून प्रश्न उपस्थित केला जाण्याची शक्यता असल्यामुळे संबंधित विभागांच्या जबाबदार अधिका-यांनी या चर्चेच्या वेळी विधानसभेत व विधानपरिषदेत हजर रहावे आणि त्यांच्या विभागासंबंधी काही प्रश्न उपस्थित केला गेल्यास त्यांनी त्यासंबंधी टिप्पणी तयार करुन त्याची प्रत्येकी एक प्रत मा.वित्त मंत्री, मा.वित्त राज्यमंत्री आणि सहसचिव, वित्त विभाग (अर्थसंकल्प) यांना द्यावी.

वर दर्शविलेल्या दिनांकामध्ये कांही बदल झाल्यास त्यासंबंधी मंत्रालयीन विभागांनी विधानमंडळ सचिवालयात चौकशी करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(शेखर ढवळे)
अवर सचिव, वित्त विभाग.

प्रत,

सर्व मंत्रालयीन विभाग,
मा.मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव,
मा.उप-मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव,
मा. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
शासनाचे वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
वित्त विभागातील सर्व अधिकारी व सर्व शाखा (वरील "अ" बाबत),
संचालक,अर्थ व सांख्यिकी संचालनालय,मुंबई.